असा. क्र. ३६७

रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-२०३/एमबीआय/२०००



# महाराष्ट्र शासन राजपत्र

असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

गुरुवार, नोव्हेंबर २३, २०००/अग्रहायण २, शके १९२२

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार-ब

महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.

पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १४ नोव्हेंबर २०००

अधिसूचना

महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१.

क्रमांक ग्रापापु.१०००/प्र.क्र. १०७ (१)/पापु-०७.— महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (१९६२ चा महा. ५) मधील कलम १०० चे उप-कलम (१), खंड (बी) आणि कलम ६ चे उप-कलम (२) अन्वये प्रदत्त केलेल्या अधिकाराचा वापर करून महाराष्ट्र शासन असे निदेश देत आहे की,—

(अ) पाणीपुरवठा व स्वच्छता विभागामार्फत महसुली जिल्ह्यांमध्ये राबविल्या जाणा-या, सोबतच्या अनुसूचीच्या स्तंभ (२) मध्ये नमूद केलेल्या सर्व योजना अनुसूचीच्या स्तंभ (३) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून संबंधित जिल्हा परिषदांकडे दिनांक १४ नोव्हेंबर २००० पासून हस्तांतरित व निहित होतील.

(ब) वर नमूद केल्याप्रमाणे या योजना हस्तांतरित झाल्यावर सर्व जिल्हा परिषदांना या योजनेच्या कार्यान्वयनासाठी संबंधित जिल्हा परिषद ज्या " महसुली जिल्ह्यासाठी " स्थापन झाल्या आहेत त्या " महसुली जिल्ह्यामध्ये " अंतर्भूत होणा-या परंतु " जिल्ह्याबाहेरील " अतिरिक्त कार्यक्षेत्राकरिता या योजनेच्या सर्व बाबींकरिता प्राधिकार असतील.

## अनुसूची

| अ. क्र. (१) | विकास योजना व कार्य (२) | अटी व शर्ती (३) |
|---|---|---|
| १. | विंधण विहीर कार्यक्रम | (१) ही अधिसूचना जारी होण्यापूर्वी, ही योजना जशी कार्यरत होती तशीच कार्यरत राहील.<br>(२) या योजनेत कोणताही बदल राज्य शासनाच्या किंवा राज्य शासनाने यासाठी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांच्या पूर्वसूचनेशिवाय करण्यात येऊ नये.<br>(३) योजनेबाबतचा प्रगती अहवाल व योजनेसंबंधातील इतर बाबी राज्य शासनास व भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेस आवश्यकतेनुसार वेळोवेळी सादर करण्यात याव्यात.<br>(४) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा किंवा राज्य शासन यांनी दिलेल्या तांत्रिक सल्ल्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.<br>(५) राज्य शासनाने योजनेसंबंधात मागविलेली माहिती/अहवाल आवश्यकतेनुसार व वेळोवेळी सादर करण्यात यावी. |
| २. | वायुसंपीडक व सुरूंग योजना | (१) ही अधिसूचना जारी होण्यापूर्वी, ही योजना जशी कार्यरत होती तशीच कार्यरत राहील.<br>(२) या योजनेत कोणताही बदल राज्य शासनाच्या किंवा राज्य शासनाने यासाठी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांच्या पूर्वसूचनेशिवाय करण्यात येऊ नये.<br>(३) राज्य शासनाने योजनेसंबंधात मागविलेली माहिती/अहवाल आवश्यकतेनुसार व वेळोवेळी सादर करण्यात यावी. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सुधीर ठाकरे,**

शासनाचे उप सचिव.

75

## WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, Dated the 14th November 2000

*NOTIFICATION*

MAHARASHTRA ZILLA PARISHADS AND PANCHAYAT SAMITIS ACT, 1961.

No. GRAPAPU/1000/CR-107(1)/WS-07.—In exercise of the powers conferred by clause (*b*) of sub-section (*1*) of section 100 and sub-section (2) of section 6 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah.V of 1962) and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby directs that,—

(*a*) all Schemes mentioned in column (2) of the schedule hereto which were implemented by the Water Supply and Sanitation Department within the revenue districts shall now be transferred to, and vested in, the respective Zilla Parishads subject to the terms and conditions specified against it in column (3) of that schedule, with effect from the 14th day of November 2000.

(*b*) all Zilla Parishads shall, on transfer of the Schemes to them as aforesaid, shall also have the authority for all purposes of the said Schemes over any additional areas in which the said Schemes are operating which is outside the district, but within the revenue districts for which the Zilla Parishads are established.

## SCHEDULE

| Sr. No. (1) | Works and Development Schemes. (2) | Terms and Conditions (3) |
|---|---|---|
| 1 | Scheme for Borewell | (1) The Schemes shall be carried out on the lines it was being carried out immediately prior to this notification.<br>(2) Any change proposed to be made in relation to the Scheme shall be made with the prior approval of the State Government or of an officer of the State Government authorized in this behalf by the State Government.<br>(3) The reports regarding progress and other matter relating to the Scheme shall be submitted in such manner and at such times as the State Government and Ground Water Survey and Development Agency may require in this behalf.<br>(4) Such technical guidance as may be given by the Director, Groundwater Survey and Development Agency or State Government shall be acted upon.<br>(5) Any information in regard to the Scheme as may be needed by the State Government shall be furnished in such manner and at such times as may be required. |
| 2. | Scheme for Boring and Blasting of Wells. | (1) The Scheme's shall be carried out on the lines it was being carried out immediately prior to this notification.<br>(2) Any change proposed to be made in relation to the Scheme shall be made with the prior approval of the State Government or of an Officer of the State Government authorized in this behalf by the State Government.<br>(3) Any information in regard to the Scheme as may be needed by the State Government shall be furnished in such manner and at such times as may be required. |

By order and in the name of the Governor of Maharashtra,

SUDHIR THAKARE,
Deputy Secretary to Government.

पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक १४ नोव्हेंबर २०००

आदेश

**महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१.**

क्रमांक ग्रापापु. १०००/प्रक्र १०७ (३)/पापु-०७.—ज्याअर्थी, महाराष्ट्र शासन अधिसूचना, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक ग्रापापु. १०००/प्रक्र. १०७(१)/पापु-०७, दिनांक १४ नोव्हेंबर २००० च्या अनुसूचीमध्ये दर्शविलेल्या योजना महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (१९६२ चा महा. ५) मधील कलम १०० चे उप-कलम (१) खंड (ब) आणि कलम ६ च्या उप-कलम (२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करून जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित करण्यात आलेल्या आहेत;

आणि ज्याअर्थी, जिल्हा परिषदांकडे सोपविण्यात आलेली जबाबदारी आणि कामे पार पाडता यावीत म्हणून उक्त अधिनियमाच्या कलम २३९ खंड (अ) अन्वये राज्यस्तरावरील वर्ग-१ (गट -अ) व वर्ग-२ (गट -ब) मधील अधिकारी जिल्हा परिषदेकडे नियुक्त करण्याचे अधिकार राज्य शासनाला आहेत;

म्हणून, आता, महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (१९६२ चा महा. ५) चे कलम २३९ खंड(अ) अन्वये प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करून परिशिष्ट-१ मध्ये दर्शविण्यात आलेल्या राज्य शासनाकडील पाणीपुरवठा व स्वच्छता विभागातील (भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील) वर्ग-१ (गट -अ) व वर्ग-२ (गट -ब) ची पदे धारण करीत असलेल्या अधिका-यांना परिशिष्ट-२ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून संबंधित जिल्हा परिषदांकडे पदस्थापित करण्यात येत आहे.

परिशिष्ट-१

| अ.क्र. (१) | पदनाम (२) | पदसंख्या (३) | गट (४) | वेतनश्रेणी (५) |
|---|---|---|---|---|
| १ | उपअभियंता (यांत्रिकी) | २९ | ब | ८,०००-१३,५०० |
| २ | सहाय्यक भूवैज्ञानिक | ३३ | ब | ७,५००-१२,००० |
| ३ | कनिष्ठ भूवैज्ञानिक | ६६ | ब | ६,५००-१०,५०० |
| | एकूण .. | १२८ | | |

परिशिष्ट-२

जिल्हा परिषदेकडे पदस्थापना करावयाच्या अधिका-यांच्या सेवेच्या अटी व शर्ती

(१) जिल्हा परिषदेकडे पदस्थापित करण्यात आलेल्या अधिका-यांच्या सेवेच्या अटी व शर्ती त्यांच्या अशा पदस्थापनेच्या निकटपूर्वी त्यांना लागू असलेल्या अटी व शर्तीमध्ये राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेखेरीज त्यांचे नुकसान होईल अशा त-हेने फेरबदल करता येणार नाही.

(२) पदस्थापित करण्यात आलेल्या वर्ग-१ (गट -अ) व वर्ग-२ (गट -ब) च्या अधिका-यांचे वेतन व भत्ते संबंधित प्रशासकीय विभागाकडून जिल्हा निधीमध्ये जमा करण्यात आलेल्या रकमेमधून अदा करण्यात येतील.

(३) पदस्थापित करण्यात आलेल्या अधिका-यांवर संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे प्रशासकीय नियंत्रण राहील. तथापि जिल्हांतर्गत वर्ग-२ (गट-ब) मधील अधिका-यांच्या बदलीचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना राहतील. तसेच त्यांच्यावर महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ मधील नियम १४ नुसार शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी सक्षम असतील.

(४) वर्ग-१ (गट -अ) मधील अधिका-यांचे गोपनीय अहवाल संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी लिहितील व त्यांचे पुनर्विलोकन संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा हे करतील. तसेच वर्ग-२ (गट -ब) मधील अधिका-यांचे गोपनीय अहवाल संबंधित विभाग प्रमुख (कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणीपुरवठा विभाग) हे लिहितील. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे पुनर्विलोकन करतील व ते अंतिमतः संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा हे स्विकृत करतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सुधीर ठाकरे,**
शासनाचे उप सचिव.

**Water Supply and Sanitation Department**

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 14th November 2000

**Order**

MAHARASHTRA ZILLA PARISHADS AND PANCHAYAT SAMITIS ACT, 1961.

No.GRAPAPU-1000/CR-107(3)/WS-07.— Whereas, the Government of Maharashtra by Government Notification, Water Supply and Sanitation Department No. GRAPAPU-1000/CR-107(1)/WS-07, dated the 14th November 2000 issued in exercise of the powers conferred by clause (*b*) of sub-section (*1*) of section 100 and sub-section (2) of section 6 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah. V of 1962), has transferred the Schemes mentioned therein to the Zilla Parishads;

And whereas, the State Government has been empowered under clause (a) of section 239 of the said Act, to post Class I (Group-A) and Class II (Group-B) Officers of the State Government to the Zilla Parishads, to discharge the duties and functions imposed on them by or under the said Act;

Now, therefore, in exercise of the powers conferred by clause (a) of section 239 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah. V of 1962), the Government of Maharashtra hereby posts the Officers of Class I (Group-A) and Class II (Group-B) services of the State Government in the Water Supply and Sanitation Department (Groundwater Surveys and Development Agency ) as mentioned in **Appendix I** to work under the respective Zilla Parishads, on the terms and conditions mentioned in **Appendix II** appended hereto.

*Appendix I*

| Sr. No. (1) | Name (2) | No.of Posts (3) | Group (4) | Pay Scale (5) |
|---|---|---|---|---|
| 1. | Deputy Engineer (Mechanical) | 29 | B | 8,000-13,500 |
| 2. | Assistant Geologist | 33 | B | 7,500-12,000 |
| 3. | Junior Geologist | 66 | B | 6,500-10,500 |
| | Total .. | 128 | | |

*Appendix II*

*The terms and conditions for the officers to be posted in Zilla Parishads:—*

(1) The terms of service applicable immediately before the specified date in the case of any such officer shall not be varied to his disadvantage except with the previous approval of the State Government.

(2) The pay and allowances of the officers from Class I (Group-A) and Class II (Group-B) shall be made from the grants made available by the concerned administrative departments.

(3) The Chief Executive Officer shall have the over all control over the officers posted in Zilla Parishads. However, the powers of transfer of Class II (Group-B) officer within the District shall be within the Chief Executive Officer of Zilla Parishad. Simlarly, the Chief Executive Officer, Zilla Parishads shall be competent to take disciplinary action under Rule 14 of the Maharashtra Civil Services ( Discipline and Appeal ) Rules, 1979.

(4) The Confidential Reports of the officers from Class I (Group-A) shall be written by the Chief Executive Officer and shall be reviewed by Director, Ground Water Surveys and Development Agency. The Confidential Reports of the officers from Class II (Group-B) shall be written by the Head of the Department (Executive Engineer,Water supply Division) and shall be reviewed by the Chief Executive Officer, of the Zilla Parishads and finally accepted by the concerned Director, Ground Water Surveys and Devlopment Agency.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

SUDHIR THAKARE,
Deputy Secretary to Government.

पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १४ नोव्हेंबर २०००

**आदेश**

**महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१.**

क्रमांक ग्रापापु.१०००/प्रक्र१०७(४)/पापु-०७.---ज्याअर्थी, महाराष्ट्र शासन अधिसूचना, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक ग्रापापु.१०००/प्रक्र१०७(१)/पापु-०७, दिनांक १४ नोव्हेंबर २००० च्या अनुसूचीमध्ये दर्शविलेल्या योजना महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (१९६२ चा महा. ५) मधील कलम १०० चे उप कलम (१) खंड (ब) आणि कलम ६ च्या उप कलम (२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करुन जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित करण्यात आलेल्या आहेत ;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम २५३ ब ब अन्वये राज्य शासनाकडील वर्ग-३ (गट -क) व वर्ग-४ (गट-ड) मधील पदधारकांना जिल्हा परिषदेकडे प्रतिनियुक्ती देण्याचे अधिकार राज्य शासनाला आहेत ;

ज्याअर्थी, या योजना जिल्हा परिषदांकडे हस्तांतरित झाल्याने या योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी राज्य शासनाच्या सेवेतील वर्ग-३ (गट-क) व वर्ग-४ (गट-ड) ची पदे धारण करीत असलेल्या कर्मचा-यांची जिल्हा परिषदांकडे प्रतिनियुक्ती करणे आवश्यक आहे.

म्हणुन, आता, महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (१९६२ चा महा. ५) कलम २५३ ब ब अन्वये प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन परिशिष्ट-१ मध्ये दर्शविण्यात आलेल्या राज्य शासनाकडील पाणीपुरवठा व स्वच्छता विभागातील (भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील) वर्ग-३ (गट-क) व वर्ग-४ (गट-ड) मधील पदधारकांना परिशिष्ट-२ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून संबंधित जिल्हा परिषदांकडे प्रतिनियुक्त करण्यात येत आहे.

## परिशिष्ट-१

| अ.क्र. (१) | पदनाम (२) | पदसंख्या (३) | गट (४) | वेतनश्रेणी (५) |
|---|---|---|---|---|
| १ | कनिष्ठ अभियंता (यांत्रिकी) | ९१ | क | ५,५००—९,००० |
| २ | यांत्रिकी .. | २९ | क | ४,०००—६,००० |
| ३ | वरिष्ठ लिपिक .. | २९ | क | ४,०००—६,००० |
| ४ | सहाय्यक आवेदक .. | ३३ | क | ४,०००—६,००० |
| ५ | वायु संपिडक चालक .. | १४८ | क | ३,२००—४,९०० |
| ६ | जॅक हॅमर ड्रिलर .. | १२१ | क | ३,२००—४,९०० |
| ७ | रिगमन .. | ३३ | क | ३,२००—४,९०० |
| ८ | कनिष्ठ लिपिक .. | २९ | क | ३,०५०—४,५९० |
| ९ | वाहनचालक .. | ६२ | क | ३,०५०—४,५९० |
| १० | शिपाई .. | २९ | ड | २,५५०—३,२०० |
| ११ | मदतनीस .. | ५८ | ड | २,५५०—३,२०० |
| | एकूण .. | ६७२ | | |

## परिशिष्ट-२

### जिल्हा परिषदेकडे प्रतिनियुक्त करावयाच्या वर्ग-३ (गट-क) व वर्ग-४ (गट-ड) च्या कर्मचा-यांसाठी सेवेच्या अटी व शर्ती

(१) जिल्हा परिषदेकडे प्रतिनियुक्त करण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या सेवेच्या अटी व शर्ती, त्यांच्या अशा पदस्थापनेच्या निकटपूर्वी त्यांना लागू असलेल्या अटी व शर्तींमध्ये राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेखेरीज त्यांचे नुकसान होईल अशातऱ्हेने फेरबदल करता येणार नाही.

(२) प्रतिनियुक्ती करण्यात आलेल्या वर्ग-३ (गट-क) व वर्ग-४ (गट-ड) च्या कर्मचा-यांचे वेतन व भत्ते संबंधित प्रशासकीय विभागाकडून जिल्हा निधिमध्ये जमा करण्यात आलेल्या रकमेमधून अदा करण्यात येतील.

(३) प्रतिनियुक्त करण्यात आलेल्या कर्मचा-यावर संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे प्रशासकीय नियंत्रण राहील.

(४) या कर्मचा-यांना प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

(५) प्रतिनियुक्त झालेल्या कर्मचा-यांच्या बाबतीत शिस्तभंगाची कार्यवाही करण्याचा प्रश्न उद्‌भवला तर त्यांच्या बाबतीत महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील नियम १४ नुसार शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे सक्षम राहतील.

(६) अशा वर्ग-३ (गट-क) व वर्ग-४ (गट-ड) मधील कर्मचा-यांच्या राजीनामा, मृत्यु, सेवानिवृत्ती इत्यादी कारणांमुळे कोणतेही पद रिक्त झाल्यास असे रिक्त पद संबंधित जिल्हा परिषदेकडून प्रतिनियुक्तीवर असलेल्या शासकीय कर्मच्या-यांच्या निम्न संवर्गामधून भरण्यात यावी :

परंतु , निम्न संवर्गात पदोन्नतीसाठी अथवा पदे भरण्यासाठी शासकीय कर्मचारी उपलब्ध नसल्यास संबंधित जिल्हा परिषदेस असे रिक्त पद आपल्या कर्मचा-यांमधून भरता येईल.

(७) वर्ग-३ (गट-क) व वर्ग-४ (गट-ड) मधील कर्मचा-यांचे गोपनीय अहवाल जिल्हा परिषदेचे विभाग प्रमुख लिहितील (कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग) व त्यांचे पुनर्विलोकन जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी करतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सुधीर ठाकरे,

शासनाचे उप सचिव.

## WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, Dated the 14th November, 2000

### Order

MAHARASHTRA ZILLA PARISHADS AND PANCHAYAT SAMITIS ACT, 1961.

No. GRAPAPU.1000/CR107(4)/WS-07.—Whereas, the Government of Maharashtra by Government Notification, Water Supply and Sanitation Department, No. GRAPAPU. 1000/ CR-107(1)/ WS-07, dated 14th November, 2000 issued in exercise of the powers conferred by clause *(b)* of sub-section *(1)* of section 100 and sub-section (2) of section 6 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act,1961 (Mah.V of 1962), has transferred the Schemes mentioned therein to the Zilla Parishads ;

And whereas, under section 253BB of the said Act, the State Government is empowered to depute the persons holding the posts in Class III (Group-C) and Class IV (Group-D) service of the State Government to the Zilla Parishads ;

And whereas, to implement these Schemes it is necessary to depute the persons holding the posts in the Class III (Group-C) and Class IV (Group-D) service of the State Government, as these Schemes are transferred to establishment of the Zilla Parishads ;

Now, therefore, in exercise of the powers conferred by section 253BB of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah. V of 1962), the Government of Maharashtra hereby deputes the persons holding the posts in the Class III (Group-C) and Class IV (Group-D) service of the Water Supply and Sanitation Department (Groundwater Surveys and Development Agency) as mentioned Appendix I, to the Zilla Parishads on the terms and conditions mentioned in Appendix II, appended hereto.

*APPENDIX-I*

| Sr. No. (1) | Name (2) | No.of Posts (3) | Group (4) | Pay Scale (5) |
|---|---|---|---|---|
| 1 | Junior Engineer (Mechanical) | 91 | C | 5,500-9,000 |
| 2 | Mechanic .. | 29 | C | 4,000-6,000 |
| 3 | Senior Clerk .. | 29 | C | 4,000-6,000 |
| 4 | Assistant Driller .. | 33 | C | 4,000-6,000 |
| 5 | Air Compressor Driver .. | 154 | C | 3,200-4,900 |
| 6 | Jack Hammer Driller .. | 125 | C | 3,200-4,900 |
| 7 | Rigman . | 33 | C | 3,200-4,900 |
| 8 | Junior Clerk .. | 29 | C | 3,050-4,590 |
| 9 | Driver .. | 62 | C | 3,050-4,590 |
| 10 | Peon .. | 29 | D | 2,550-3,200 |
| 11 | Helper .. | 58 | D | 2,550-3,200 |
| | Total .. | 672 | | |

*APPENDIX II*

**The terms and conditions the Class III (Group C) and Class IV (Group D) employees to be deputed to Zilla Parishads**

(1) The terms of service applicable immediately before the specified date in the case of any such officer shall not be varied to his disadvantage except with the previous approval of the State Government.

(2) The pay and allowances of the Class III (Group C) and Class IV (Group D) employees on deputation to Zilla Parishads shall be made from the funds made available by the concerned Administrative Department .

(3) The Chief Executive Officer of the Zilla Parishads shall have the over all control over these employees.

(4) These employees shall not be entitled for any deputation allowance.

(5) In the event of any disciplinary action of the State employees on deputation to Zilla Parishads, the Chief Executive Officer of the Zilla Parishads shall be competent to take action as per Rule 14 of the Maharashtra Civil Services (Discipline and Appeal) Rules, 1979.

(6) In the event of any vacancy on account of resignation, death, retirement, etc. in such Class III (Group C) and Class IV (Group D) employees, such vacancy shall be filled up by the Zilla Parishads concerned only from the feeder cadre of the Government employees on deputation:

Provided that, if no such Government employee is available from the feeder cadre for promotion or filling of the vacancy, the concerned Zilla Parishad may fill up such vacancy from amongst its employees.

(7) The Confidential Report of the employees from Class III (Group C) and Class IV (Group D) shall be written by the Head of the Department (Executive Engineer, Water Supply Division) of the Zilla Parishads and they shall be reviewed by the Chief Executive Officer of the Zilla Parishads.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

SUDHIR THAKARE,
Deputy Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई